ठाणे मध्यवर्ती कारागृह येथे २ वॉच टॉवर्स बांधण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

क्रमांक: शासन निर्णय, क्र. इआयजे-२०९२/२(३०३) पीआरएस-२,
दिनांक :- २२ जानेवारी, १९९३.

वाचा :- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक बीएलडी/अंदाजपत्रक/१९९२-९३/कक्ष-३, दि. ७.११.१९९२.

शासन निर्णय :- ठाणे मध्यवर्ती कारागृह हे अतिसुरक्षा कारागृह असून तेथे क्रूर प्रवृत्तीचे खतरनाक टोळीवाले व अंमली पदार्थांचे व्यवसायी, इ. प्रकारचे कैदी ठेवले जातात. त्यासाठी सदर कारागृहाची सुरक्षितता मजबूत करणे आवश्यक आहे. त्या दृष्टीने सदर कारागृहाच्या मुख्य तटभिंतीवर २ वॉच टॉवर्स बांधण्यास येणाऱ्या अंदाजित खर्च रु. २,२८,८९८ /- [रुपये दोन लाख अठ्ठावीस हजार आठशे अठ्याण्णव फक्त] इतक्या खर्चास शासन या आदेशाद्वारे खालील अटींवर प्रशासकीय मान्यता देत आहे.

१] नियोजन विभागाने वेळोवेळी लावलेल्या कपातीनंतरच्या उपलब्ध तरतुदीमध्ये यावरील खर्च भागविणे बंधनकारक राहील.

२] अर्थसंकल्पात योग्य ती तरतूद केल्याखेरीज सदर कामास सुरुवात करु नये.

२. यासाठी होणारा खर्च "४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१-कार्यालयीन इमारती-१०१-बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-तुरुंग" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग, वित्त विभागाच्या सहमतीने अनुक्रमे अनौ. संदर्भ क्र. ४७०/इमारत/दि. ५.१२.९२, क्र. ३३८/यो-१०, दि. १७.१२.१९९२ व क्र. सीआरर-८/९३/व्यय-८, दि. ८.१.९३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ अरविंद झणझणे ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

.....२/-

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

कारागृह उपमहानिरीक्षक, पुणे,

अधिक्षक, मध्यवर्ती कारागृह, ठाणे,

महालेखापाल, महाराष्ट्र -१ [लेखा व अनुज्ञेयता], मुंबई,

महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा परिक्षा], मुंबई,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा अधिकारी, मुंबई,

सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारत-२,

नियोजन विभाग, योजना-१०,

वित्त विभाग, व्यय-८,

निवड नस्ती.

—x—